नवीन “परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना” लागू असलेल्या महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ यांच्या तसेच विद्यापीठाच्या नियंत्रणाखालील महाविद्यालये/ संस्थाच्या आस्थापनेवरील अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या सहाव्या वेतन आयोगाची थकबाकी स्तर २ मध्ये जमा करण्याबाबतची कार्यपध्दती .

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक मपवि २०१३/प्र.क्र.६८/म्हापसू**
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : ३१ ऑगस्ट, २०१७.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अंनियो -१००५/१२६/सेवा ४, दिनांक ३१ आक्टोबर २००५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अंनियो -१००७/१८/सेवा ४, दिनांक ७ जुलै, २००७.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. वेपूर १२०९/प्र.क्र. ६९/सेवा ९, दिनांक २९ एप्रिल २००९.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अंनियो - १०१०/प्र क्र ६७/सेवा ४, दिनांक १४ डिसेंबर २०१०.
५) शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र मपवि २०१० / प्र.क्र. १४४/पदुम-१ (अ), दिनांक ७ जानेवारी २०११

**<u>प्रस्तावना</u> -**

संदर्भाधिन क्रमांक १ येथील दिनांक ३१ ऑक्टोबर २००५ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१ नोव्हेबर २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना अमलांत आली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती संदर्भाधिन क्रमांक २ येथील दिनांक ७ जुलै २००७ च्या शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आली आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ यांच्या तसेच विद्यापीठाच्या नियंत्रणाखालील महाविद्यालये/ संस्थाच्या आस्थापनेवरील कर्मचाऱ्यासाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंमलबजावणीच्या कर्यपध्दतीबाबत शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र मपवि २०१०/ प्र.क्र. १४४/पदुम-१ (अ), दिनांक ७ जानेवारी २०११ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. ज्या शासकीय/ विद्यापीठाच्या कर्मचाऱ्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू आहे, अशा कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगा ाच्या अंमलबजावणीमूळे दि. १ जानेवारी, २००६ ते ३१ मार्च २००९ पर्यंतच्या कालावधीतील सुधारित वेतनाच्या थकबाकीची रक्कम त्यांच्या नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या खात्यात जमा करण्याच्या सूचना संदर्भाधिन क्रमांक ३ येथील दिनांक २९ एप्रिल, २००९ च्या परिपत्रकातील परि १५.२ अन्वये देण्यात आल्या आहेत. संदर्भाधिन क्रमांक २ येथील दिनांक ७ जुलै २००७ च्या शासन निर्णयातील परि. ६ (ब) स्तर १ कार्यान्वित करण्यात आला असून त्यात जमा होणारी रक्कम आहरित करता न येण्याजोगी (Non-Withdrawable) आहे. त्यामुळे या योजनेतील आहरणयोग्य (withdrawable) असलेल्या स्तर २ मध्ये थकबाकीची रक्कम जमा करण्याबाबतची कार्यपध्दती शासनाने

दिनांक १४/१२/२०१० च्या उपरोक्त संदर्भ क्र ४ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केली असून, त्यामध्ये सूचित केल्यानुसार महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ यांच्या तसेच विद्यापीठाच्या नियंत्रणाखालील महाविद्यालये/ संस्थाच्या आस्थापनेवरील अधिकारी व कर्मचाऱ्यांसाठी पुढीलप्रमाणे कार्यपध्दती लागू करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय –**

२. वरील प्रस्तावनेला अनुलक्षून शासन निर्णय वित्त विभाग क्र अंनियो -१००५/१२६/सेवा-४ दिनांक ३१ ऑक्टोबर, २००५ नुसार ज्या कर्मचाऱ्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू केली आहे, अशा कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगाच्या अंमलबजावणीमुळे दिनांक १ जानेवारी २००६ ते ३१ मार्च २००९ पर्यंतच्या कालावधीत सुधारित वेतनाच्या थकबाकीची रक्कम जमा करण्याकरिता खालीलप्रमाणे कार्यवाही विहित करण्यात येत आहे.

१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत स्तर -२ कार्यान्वित करण्यात येत असून त्यामध्ये पुढील आदेश होईपर्यंत केवळ कर्मचाऱ्यांच्या दिनांक १ जानेवारी २००६ ते ३१ मार्च २००९ पर्यंतच्या कालावधीत सुधारित वेतनाच्या थकबाकीची व त्यावरील व्याजाची रक्कम जमा करण्यात येईल.

२) थकबाकीची रक्कम सन २००९-१० पासून स्तर-२ मध्ये जमा करण्याबाबतची कार्यवाही शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र वेपूर १२०९/ प्र.क्र. ६९ / सेवा -९, दिनांक २९ एप्रिल २००९ मधील परि १५.१ (क) व परि. १५.३ मधील सूचनांप्रमाणे योग्य त्या फेरफारासह करण्यात यावी. जमा झालेली रक्कम ठरवून दिलेल्या कालावधीनंतर काढण्याकरिताच्या कार्यपध्दतीचे आदेश वित्त विभागामार्फत स्वतंत्ररित्या निर्गमित झाल्यानंतर त्याआधारे योग्य त्या फेरफारासह या विभागाकडून निर्गमित करण्यात येतील.

३) दिनांक १ जानेवारी २००६ ते दिनांक ३१ मार्च २००९ या कालावधीत सेवात्याग केलेल्या/ मृत्यु पावलेल्या कर्मचाऱ्यांना थकबाकीची अनुज्ञेय असल्यास त्याप्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र वेपूर १२०९/ प्र.क्र. ६९ / सेवा -९, दिनांक २९ एप्रिल २००९ मधील परि १५.१ (ड), (इ) व (फ) मधील सूचनांप्रमाणे कार्यवाही करावी. याबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या या विभागाकडून निर्गमित करण्यात येतील.

४) स्तर २ मध्ये जमा होणाऱ्या रक्कमेचे लेखांकन व इतर कार्यपध्दतीबाबत नियंत्रक, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांचे नियंत्रण असेल. विद्यापीठाचे नियंत्रक हे विद्यापीठाच्या कर्मचाऱ्यांना त्यांच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांमार्फत प्रत्येक वित्तीय वर्षाच्या अखेरीस वार्षिक विवरणपत्र पाठवतील.

५) आहरण व संवितरण अंधिकाऱ्यांना वेतन देयकासोबत परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेखाली करण्यात आलेल्या वजातीची अनुसूची जोडतांना स्तर १ व स्तर २ खाली जमा होणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या वजातीच्या रक्कमाबाबत स्वतंत्र अनुसूची स्तर १ व स्तर २ करिता जोडणे आवश्यक आहे.

६) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेमधील स्तर २ मध्ये जमा होणारी रक्कम व त्यावरील व्याजाची रक्कम खालील लेखाशीर्षाखाली जमा करण्यात यावी.

| | |
|---|---|
| ८३४२, इतर ठेवी<br>(००) ११७ शासकीय कर्मचाऱ्यांकरीता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना<br>(०१) (१५) परिषाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना - महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर अधिकारी/कर्मचाऱ्यांचे अंशदान - स्तर-२<br>( ८३४२ ५३९३) | ८३४२ - Other Deposits<br>(००) ११७ Defined Contribution Pension Scheme for Goverment Employees<br>(०१) (१५) Defined Contribution Pension Scheme - Maharashtra Animal & Fishery Sciences University, Nagpur Officers/ Employees Contribution Tier - II<br>(८३४२ ५३९३) |

३. यासंबंधी वित्त विभागाचे वेळोवेळचे आदेश महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाचे अधिकारी व कर्मचारी यांना योग्य त्या फेरफारासह लागू राहतील.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र ४/अर्थ-१५ दिनांक ३०/०१/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashta.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१७०८३११५०९०४४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2017.08.31 15:57:33 +05'30'

**( विकास तु. कदम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -३२

३. मा. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

४. कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, फुटाळा तलाव रोड, नागपूर

५. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१ महाराष्ट्र, मुंबई

६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१ महाराष्ट्र, मुंबई

७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-२ महाराष्ट्र, नागपूर

८. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१ महाराष्ट्र, नागपूर

९. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१ महाराष्ट्र, मुंबई

१०. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.

११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

१२. उपसंचालक, राज्य देखभाल अभिकरण, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई -३२

१३. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.

१४. नियंत्रक (वित्त व लेखा), महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.

१५. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.

१६. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.

१७. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.

१८. वित्त विभाग कार्यसन सेवा- ४/ व्यय २ / अर्थ १५

१९. निवड नस्ती.